आंतरराष्ट्रीय स्तरावर मराठी भाषेचे जतन व संवर्धन करण्यासाठी आयोजित करण्यात येत असलेल्या विविध उपक्रमांसाठी "आंतरराष्ट्रीय मराठी मंच" निर्माण करणे आणि त्यासाठी समन्वयक नेमणे.

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१८/भाषा-२**

नवीन प्रशासकीय भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७.०३.२०२२

**वाचा :-**

१) मा. मंत्री, मराठी भाषा यांच्या अध्यक्षतेखाली दि. १९.०१.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त दि.२५.०१.२०२२.

२) राज्य मराठी विकास संस्था घटना, सन -१९९३.

**प्रस्तावना :-**

परदेशात स्थायिक झालेले मराठी भाषक तेथे मराठी भाषेच्या संदर्भात विविध उपक्रम, कार्यक्रम करीत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. जगातील अनेक देशातील मराठी भाषकांसाठी उपक्रम राबविण्याची तरतूद विभागाच्या अधिनस्त असलेल्या राज्य मराठी विकास संस्थेच्या घटनेमध्ये आहे. राज्य मराठी विकास संस्था ही एक स्वायत्त संस्था आहे. या संस्थेच्या घटनेतील कलम क्र. ९ मध्ये अमराठी समाजगटांना मराठी भाषा व संस्कृतीबद्दल आस्था व रुची निर्माण व्हावी म्हणून विविध साधने विकसित करणे, कलम क्र. १३ मध्ये अन्य राज्यांत व परदेशात असलेल्या मराठी भाषकांसाठी विविध भाषिक उपक्रम करणे आणि कलम क्र. १६ मध्ये स्वामित्वधन, देणग्या, शुल्क, विक्री मूल्य इत्यादी मार्गांनी संस्थेचा राखीव निधी वाढविणे या उद्दिष्टांचा समावेश आहे. ही उद्दिष्टे साध्य करण्यासाठी संस्थेकडून विशेष प्रयत्न करण्यात येत आहेत. संस्थेच्या या प्रयत्नांना शासनाकडून निश्चित दिशा मिळणे आवश्यक आहे. त्यासाठी परदेशातील मराठी भाषक आणि मराठी भाषेसाठी काम करणाऱ्या संस्थांना राज्य मराठी विकास संस्थेच्या माध्यमातून एका छत्राखाली आणून परस्पर समन्वयातून त्यांच्या उपक्रमांना शासनस्तरावर व्यासपीठ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जेणेकरुन त्यांच्या प्रयत्नांना शासनाकडून कौतुकाची थाप मिळेल आणि त्यांच्यातील परस्पर संवाद वाढून परदेशात मराठी भाषेचे जतन व संवर्धन होण्यास मदत होईल. त्यासाठी आंतरराष्ट्रीय मराठी मंचाची स्थापना करुन या मंचासाठी समन्वयक नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

विभागाच्या अधिनस्त असलेल्या राज्य मराठी विकास संस्थेच्या घटनेतील कलम क्र. ९, १३ व १६ मध्ये नमूद केल्यानुसार, अमराठी समाजगटांना मराठी भाषा व संस्कृतीबद्दल आस्था व रुची निर्माण व्हावी म्हणून विविध साधने विकसित करणे, अन्य राज्यांत व परदेशात असलेल्या मराठी भाषकांसाठी विविध भाषिक उपक्रम करणे, स्वामित्वधन, देणग्या, शुल्क, विक्री मूल्य इत्यादी मार्गांनी संस्थेचा राखीव निधी वाढवणे या उद्दिष्टांना निश्चित दिशा देण्यासाठी, परदेशात मराठी भाषेचा प्रचार-प्रसार व संवर्धनासाठी कार्य करणाऱ्या व्यक्ती, संस्था यांच्या कार्याची शासनस्तरावर दखल घेण्यासाठी आणि त्यांच्यात समन्वय निर्माण करण्यासाठी "आंतरराष्ट्रीय मराठी मंच" स्थापन करण्यात येत आहे. या मंचाच्या माध्यमातून परदेशातील मराठी भाषेच्या संवर्धनासाठी कार्यरत असलेल्या संस्था, व्यक्ती यांनी त्यांची माहिती शासनाकडे पाठविणे आवश्यक आहे. त्यासाठी संबंधित संस्था, व्यक्ती व राज्य मराठी विकास संस्था यांच्यात समन्वय साधण्यासाठी मानसेवी तत्त्वावर (Honorary basis ) एक किंवा एकापेक्षा जास्त समन्वयकांची अथवा उपसमन्वयकांची नेमणूक राज्य मराठी विकास संस्थेकडून करण्यात येईल.

**<u>समन्वयक:-</u>**

संचालक, राज्य मराठी विकास संस्था यांच्याकडून आंतरराष्ट्रीय मराठी मंचाचे काम करण्यासाठी समन्वयकाची निवड करण्यात येईल. यासाठी आवश्यक ती निवडपध्दती राज्य मराठी विकास संस्थेमार्फत निश्चित करण्यात येईल. तसेच, समन्वयकाला नियुक्ती पत्र, ओळखपत्र, समन्वयाचे कार्य पार पाडताना लागणारी सर्व मदत, मार्गदर्शन, साधनसामुग्री, इत्यादी आवश्यक बाबी संचालक, राज्य मराठी विकास संस्था यांच्याकडून उपलब्ध करुन देण्यात येतील. राज्य मराठी विकास संस्थेच्या मार्गदर्शनाखाली समन्वयक खालील जबाबदाऱ्या पार पाडेल.

(१) विविध देशातील अनिवासी मराठी भाषक, मराठी भाषेसाठी काम करणारी विविध संस्था, मंडळे यांचा परस्परांबरोबर संपर्क साधून विविध देशात मराठी भाषेचा प्रचार-प्रसार, जतन व संवर्धन यासाठी होणारे उपक्रम, कार्यक्रम याबाबतचा आढावा घेऊन त्याबाबतची माहिती राज्य मराठी विकास संस्थेला सादर करणे.

(२) जगभरातील विविध मराठी मंडळांची सूची तयार करणे, उपलब्ध सूचीत आवश्यक ते बदल करुन सूची अद्ययावत करणे व त्याबाबतची माहिती राज्य मराठी विकास संस्थेला देणे.

(३) संचालक, राज्य मराठी विकास संस्था व परदेशातील विविध महाराष्ट्र मंडळांचे प्रतिनिधी यांमधील दुवा/समन्वयक या नात्याने त्यांच्या कार्याची माहिती तसेच मराठी साहित्य, देवनागरी लिपी या संबंधातील कार्यक्रमांचे वृत्तांकन मिळवून त्यांचे दुवे राज्य

मराठी विकास संस्थेपर्यंत पोहोचविणे. (४) राज्य मराठी विकास संस्थेच्या घटनेत नमूद केलेल्या कलम क्र. ९ व १३ मध्ये नमूद केलेली उद्दिष्टे पूर्ण करण्यासाठी संस्थेशी चर्चा करुन विविध कार्यक्रमांचे आयोजन करणे. तसेच, कलम क्र. १६ मध्ये नमूद केल्यानुसार, संस्था आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी बनण्यासाठी परदेशातील सामाजिक संस्थांकडून आर्थिक मदत मिळावी यासाठी प्रयत्न करणे.

(५) परदेशात शिकणारे मराठी व अमराठी भारतीय तसेच परदेशी विद्यार्थी यांना राज्य मराठी विकास संस्थेबरोबर मराठी भाषेचा प्रचार-प्रसार करण्याच्या विविध उपक्रमांमध्ये सहभागी होण्यास प्रोत्साहित करणे.

(६) जगभरातील समाजमाध्यमांमध्ये मराठी भाषेच्या वापरासंदर्भातील अहवाल प्राप्त करुन व त्यांचा अभ्यास करुन समाजमाध्यमांद्वारे मराठी भाषेचा प्रचार-प्रसार करण्यासंदर्भात उपक्रमांचे नियोजन करणे.

(७) मराठी भाषा-साहित्य या संदर्भात जगभरातील विविध नियतकालिकांमधून संशोधनपर लेख लिहिण्यासाठी परदेशस्थ शिक्षणसंस्थांमधील मराठी तसेच अमराठी विद्यार्थ्यांना प्रोत्साहित करणे.

**कार्यपध्दती :-**

आंतरराष्ट्रीय मराठी मंचाची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

१) आंतरराष्ट्रीय मंच समन्वयक जगातील विविध देशांत तेथील मराठी भाषक, संस्था यांच्याकडून मराठी भाषेचा प्रचार-प्रसार, संवर्धन व विकास यासाठी राबविण्यात येणाऱ्या विविध उपक्रमांची माहिती, क्षणचित्रे, दृकश्राव्य चित्रफिती राज्य मराठी विकास संस्थेकडे पाठवेल.

२) तद्नंतर, राज्य मराठी विकास संस्थेकडून सदर माहितीचे परीक्षण/विश्वासार्हता तपासण्यात येईल व सदर माहिती विभागाच्या www.marathi.gov.in/nri या संकेतस्थळाच्या पृष्ठावर उपलब्ध करण्यासाठी विभागाकडे सादर करण्यात येईल.

३) राज्य मराठी विकास संस्थेकडून प्राप्त माहितीपैकी कोणती माहिती विभागाच्या www.marathi.gov.in/nri या संकेतस्थळाच्या पृष्ठावर उपलब्ध करावी याबाबतचा अंतिम निर्णय मराठी भाषा विभागाचा असेल.

४) परदेशातील अनिवासी मराठी भाषक, मराठी भाषेसाठी काम करणाऱ्या विविध संस्था, मंडळे यांना राज्य मराठी विकास संस्थेकडून काही पुस्तके, बक्षिसे किंवा तत्सम

स्वरुपाची काही प्रोत्साहनपर मदत द्यावयाची असेल तर, त्यासाठी होणारा खर्च " मागणी क्र. झेड एफ - २, २२०५, कला व संस्कृती, (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०२) कार्यक्रम, (०२) (०१) राज्य मराठी विकास संस्था ( कार्यक्रम ), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ ३२०५) " या लेखाशीर्षाखाली टाकण्यात यावा व त्यासाठी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०७१६५७०२५७३३ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे..

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MILIND BHAGWAN GAWADE

Digitally signed by MILIND BHAGWAN GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d043e1f55c6ded344ffebea8801d8c286bfdcafaea54c716c9b31b47b87a9476, pseudonym=3FD721BE2B19DF245E0157FD3DC7B26475009465, serialNumber=EF777B84EAC7F675E3493144EF06F0FA1CB47DE2A32BE1156CA04D038F42D6E1, cn=MILIND BHAGWAN GAWADE
Date: 2022.03.07 16:59:21 +05'30'

**( मिलिंद गवादे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ४०० ०३५
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांच खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री / राज्यमंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९) मा. अध्यक्ष व सदस्य, मराठी भाषा समिती, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
११) प्रधान सचिव (मराठी भाषा विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
१४) प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
१५) लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई

१६) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)

१७) सह सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर

१९) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर

२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

२२) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

२३) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई

२४) भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२६) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई

२७) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

२८) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई

२९) निवड नस्ती/भाषा-२